**फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांच्या मान्यतेस अनुसरून, शैक्षणिक वर्ष २०२४-२५ पासून विद्यमान पदवी औषधनिर्माणशास्त्र अभ्यासक्रमाच्या संस्थेत नवीन पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम सुरु करण्यास शासन मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## उच्च व तंत्रशिक्षण विभाग

**शासन निर्णय क्र.मान्यता-२०२४/प्र.क्र.२७५/तांशि-४**

मादाम कामा रोड, हुतात्मा चौक राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.

**दिनांक: २६ ऑगस्ट, २०२४.**

**वाचा** : संचालक, तंत्र शिक्षण यांचे पत्र क्र.२/पीसीआय-मान्यता/२०२४-२५/६२६, दि.२१.०८.२०२४.

**प्रस्तावना** : फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन, शैक्षणिक वर्ष २०२४-२५ पासून विद्यमान पदवी औषधनिर्माणशास्त्र अभ्यासक्रमाच्या संस्थेत नवीन पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम सुरु करण्यास शासन मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव संचालक, तंत्रशिक्षण यांनी वाचा येथील पत्रान्वये शासनास सादर केला आहे. त्यानुषंगाने शासन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** : फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन व संचालक, तंत्र शिक्षण यांनी प्रस्तावित केल्यानुसार, सोबतच्या प्रपत्रामध्ये दर्शविल्याप्रमाणे राजर्षी शाहू कॉलेज ऑफ फार्मसी, मरखेल, ता.देगलूर, जि.नांदेड या विद्यमान विनाअनुदानित संस्थेत, नवीन पदव्युत्तर पदवी औषधनिर्माणशास्त्र अभ्यासक्रम, शैक्षणिक वर्ष २०२४-२५ पासून सुरु करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

### अटी व शर्ती:-

१) सदर मान्यता ही कायम विनाअनुदान तत्वावर राहील.

२) प्रस्तुत बाबतीत फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांनी विहित केलेल्या तसेच दि.२१ मे, १९८३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील.

३) शासनाने विहित केलेल्या, तसेच, फार्मसी कॉन्सिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांनी विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत संस्थेस, संचालक, तंत्र शिक्षण यांच्यासोबत करारनामा करावा लागेल. तसेच, आवश्यक कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पूर्तता संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्या संमतीने समाधानकारकरित्या करण्यात येईल.

४) संबंधित संस्थेने संचालक, तंत्र शिक्षण यांचेकडे आवश्यक ती संचित ठेव संयुक्त खात्यात भरुन इतर कायदेशीर बाबींची पूर्तता करावी.

५) सदर अभ्यासक्रमांचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या संबंधित अभ्यासक्रमाच्या प्रवेश नियमानुसार / पद्धतीनुसार करण्यात येतील.

६) शुल्क नियामक प्राधिकरणाने विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क संबंधित संस्थांनी आकारल्यास, त्या संस्थांवर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिट्यूशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ अनुसार कारवाई करण्यात येईल.

७) संस्थेने अभ्यासक्रम चालविण्यास शिक्षक, शिक्षकेतर व इतर तांत्रिक कर्मचारी, फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली यांच्या निकषाप्रमाणे नियुक्त करावेत. त्यांना नियमानुसार वेतन व भत्ते देण्यात यावेत. वेतन व भत्ते इ. बाबत शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांकडून तसेच, संस्थेविरुध्द विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी आल्यास संस्थेवर कडक कारवाई करण्यात येईल.

८) संस्थेने आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके फार्मसी कौंसिल ऑफ इंडियाच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक आहे. तसेच, विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे. तसेच, फार्मसी कौंसिल ऑफ इंडियाच्या मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा. प्रयोगशाळा, वाचनालय, वर्गखोल्या इ.) करणे आवश्यक आहे.

९) रॅगिंग संदर्भात मा.सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करणे आवश्यक राहील.

१०) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, दि.२२.०२.२०१८ अन्वये विहित केलेले नोंदणी शुल्क संबंधित महाविद्यालय/संस्थेने भरणा केले नसेल, तर ते सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय, छत्रपती संभाजीनगर यांनी संबंधित महाविद्यालय/ संस्थेकडून भरणा करुन घ्यावे.

११) महाविद्यालयाने/संस्थेने सदर अभ्यासक्रमाकरीता, संबंधित विद्यापिठाचे संलग्नीकरण प्राप्त करुन घेणे आवश्यक राहील.

२. याशिवाय संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती संस्थेवर बंधनकारक राहतील.

३. या शासन मान्यतेनुसार उक्त संस्था / महाविद्यालयातील अभ्यासक्रमांचा केंद्रीभूत प्रवेश प्रक्रियेमध्ये समावेश होण्याकरिता संचालक, तंत्र शिक्षण यांनी आवश्यक ते आदेश निर्गमित करावेत.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८२६१५१७१२९४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SAMEER LAXMAN DHERE

Digitally signed by SAMEER LAXMAN DHERE
DN: CN = SAMEER LAXMAN DHERE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT
Date: 2024.08.26 15:32:06 +05'30'

**( समीर ढेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई.
३) सहसंचालक, तंत्र शिक्षण, विभागीय कार्यालय, छत्रपती संभाजीनगर (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत).
४) कुलसचिव, संबंधित विद्यापीठ (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत).
५) संबंधित संस्था (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
६) निवड नस्ती/तांशि-४

प्रपत्र

HTED G.R.No.Manyata-2024/C.R.275/TE-4, Dated: 26th August, 2024

List of New Course in existing Unaided Pharmacy Institute, Approved by PCI for A.Y. 2024-25

| Sr.No. | DTE CODE | PCI CODE | INSTITUTE NAME | STATUS | PROGRAMME | UNIVERSITY NAME | LEVEL OF COURSE | MAIN COURSE NAME | COURSE NAME | INTAKE APPROVED BY GOVT. A.Y. 2023-24 | INTAKE APPROVED BY PCI A.Y. 2024-25 | VARIATION | REMARKS |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 2556 | PCI-1902 | Saraswati Bahuuddeshiya Sevabhavi Sanstha's Rajarshi Shahu College of Pharmacy, Nanded, Markhel - 431 718 | Un-Aided | PHARMACY | Swami Ramanand Teerth Marathwada University, Nanded | POST GRADUATE | M. Pharmacy | Pharmaceutical Quality Assurance | 0 | 15 | 15 | New Course |
| | | | | | | | POST GRADUATE | M. Pharmacy | Pharmaceutical Chemistry | 0 | 15 | 15 | New Course |
| | | | | | | | POST GRADUATE | M. Pharmacy | Pharmaceutics | 0 | 15 | 15 | New Course |

SAMEER LAXMAN DHERE

Digitally signed by SAMEER LAXMAN DHERE
DN: CN = SAMEER LAXMAN DHERE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT
Date: 2024.08.26 15:32:20 +05'30'